**क्रांतीअग्रणी जी. डी. बापू लाड यांच्या मौजे कुंडल, ता. पलूस, जि. सांगली येथील स्मारकासाठी निधी मंजूर करण्याबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. स्मारक- ३११२/२६/प्र. क्र. १८/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक: २५ जानेवारी, २०१७

<u>वाचा</u>:-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक- ३११२/२६/प्र. क्र. १८/२९, दिनांक ४.०३.२०१४
२) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.स्मारक-३११२/२६/प्र.क्र.१८/२९, दिनांक २.८.२०१४
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.स्मारक-३११४/प्र.क्र.१६६/२९, दिनांक २.०८.२०१४
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.स्मारक-३११२/२६/प्र.क्र.१८/२९, दिनांक २८.१०.२०१५
५) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.गृह-१/कार्या-६/पोल-१ /स्मारक/ आरआर/९५८/१६, दिनांक २१.१०.२०१६

**<u>शासन निर्णय</u>:-**

क्रांतीअग्रणी जी. डी. बापू लाड यांचे मौजे कुंडल, ता. पलूस, जि. सांगली येथे स्मारक बांधण्यासाठी रु. ४९५.८७ लाख (अक्षरी रुपये चार कोटी पंच्याण्णव लाख सत्त्याऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास उपरोक्त अनु. क्र.१ व २ येथील शासन निर्णय व शुद्धीपत्रकान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच अनु. क्र. ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये रु. ४०.०० लाख व रु. २००.०० लाख याप्रमाणे एकूण २४.०० लाख इतका निधी मंजूर व वितरित करण्यात आला आहे. सदर स्मारकासाठी उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याबाबत जिल्हाधिकारी, सांगली यांनी दिनांक २१.१०.२०१६ च्या पत्रान्वये मागणी केली आहे. तथापि, उपलब्ध तरतूदीच्या मर्यादेत रु. ८१.४८ लाख ( रुपये एक्क्याऐंशी लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त ) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -ए-४,
मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे
८०- सर्वसाधारण, ८००-राज्य योजना
(००)(०२) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम
(२०५९ ३१७७), ५३ मोठी बांधकामे

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील परि. १४ नमूद केल्यानुसार ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू आर्थिक वर्षामध्ये स्मारकाच्या कामासाठी खर्च करण्याची जिल्हाधिकारी, सांगली यांनी दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त निधीमधून खर्च करण्यासाठी तहसिलदार (सर्वसाधारण), जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली (सांकेतांक क्रमांक २४०१०००९४८) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर

निधीच्या खर्चाची, निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्याची तसेच महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, सांगली यांची राहील.

५. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र. क्र. ८९/ अर्थसंकल्प-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील परिच्छेद ७ (क) व परिच्छेद ८ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१३२७०७३२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra M Jadhav

Digitally signed by Rajendra M Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=656ebca17998fd5c29178a5abcf1aa60d72bd5515ddc791d9ad9786418f07e4f, cn=Rajendra M Jadhav
Date: 2017.01.25 13:25:23 +05'30'

**( रा.मा.जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) मा.पालकमंत्री, जिल्हा सांगली यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) अप्पर मुख्य सचिव,(र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) जिल्हाधिकारी, सांगली
७) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
११) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१२) निवासी उपजिल्हाधिकारी,सांगली
१३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सांगली
१४) कक्ष अधिकारी (कार्या-२५ / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४/अर्थसंकल्प-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कार्यासन अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवडनस्ती कार्यासन २९, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई